**तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**

शासन आदेश क्र. बदली-२०२४/प्र.क्र.२५/ई-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | आदेशाचा दिनांक | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.रूपेश खंडारे | शासन आदेश दि.१५.०२.२०२४ अन्वये तहसिलदार झरीजामणी, जि.यवतमाळ या पदावर पदस्थापना | स्तंभ क्र.३ येथील आदेशात अंशत: बदल करण्यात येऊन तहसिलदार सिल्लोड, जि.छत्रपती संभाजीनगर या श्री.रमेश जसवंत यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर |
| २. | श्री. मनोज ऐतवडे | शासन आदेश दि.१५.०२.२०२४ अन्वये सहाय्यक पुनर्वसन अधिकारी, कुकडी प्रकल्प, पुणे या पदावर पदस्थापना | स्तंभ क्र.३ येथील आदेशात अंशत: बदल करण्यात येऊन तहसिलदार (संगायो) जि.का.सांगली या श्री. नागनाथ भोसले यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ३. | श्री. दिपक धिवरे | शासन आदेश दि.३१.०१.२०२४ अन्वये तहसिलदार तथा स्थावर व्यवस्थापक लक्ष्मीवाडी मळा, ता.राहाता जि.अहमदनगर या पदावर पदस्थापना | स्तंभ क्र.३ येथील आदेशात अंशत: बदल करण्यात येऊन तहसिलदार तळोदा जि.नंदुरबार या रिक्त पदावर |
| ४. | श्री. अजय मधुकर घोळवे | शासन आदेश दि.३१.०१.२०२४ अन्वये पदस्थापना अधिक्षक माथेरान जि.रायगड या पदावर पदस्थापना | स्तंभ क्र. ३ येथील पदस्थापनेत अंशत: बदल करण्यात येऊन अपर तहसिलदार (अकृषक) भिवंडी जि.ठाणे या श्री. किशोर मराठे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |

२.	सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांनी बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e३.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे. श्री. रमेश जसवंत, श्री. नागनाथ भोसले व श्री. किशोर मराठे यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३.	संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये उक्त तरतुदीनुसार पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचविरुध्द लोकप्रतिनिधीत्व अधिनियम १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४.	महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा “अकार्यदिन”*(dies non)* म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५.	संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६.	सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०३१५२१५४४५९६१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.03.15 22:04:52 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

- अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य
- सर्व विभागीय आयुक्त

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).